आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे अधिपत्याखालील ४१ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२३/प्र.क्र.९९/आरोग्य-३अ,**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १२ एप्रिल, २०२३.

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक. अपदे-२०२२/प्र.क्र.२५५/आरोग्य-३अ दिनांक २१.०९.२०२२
२) शासन निर्णय,वित्त विभाग, क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. ०८.०२.२०२३
३) सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई यांचे पत्र क्र. आआसे/आस्था/कक्ष-५/टे-४/४१ अपदे/मु.वा./४४-४५/२३, दिनांक ३००५.०१.२०२३
४) अपर मुख्य सचिव (ले. व को.) वित्त विभाग यांचे अ.शा. पत्र क्रमांक.आकृबं-२०२३/प्र.क्र.१८/आपुक, दिनांक २८.०३.२०२३

शासन निर्णय :-

आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील असलेल्या ४१ अस्थायी पदांना संदर्भाधीन अ.क्र. १ येथील दिनांक २१.०९.२०२२ च्या शासन निर्णयान्वये, दि. ०१.०९.२०२२ ते दि.२८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आल्याने आरोग्य सेवा आयुक्तालयाने उपरोक्त अ.क्र. ३ येथील पत्रान्वये सदर पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील ४१ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन खालील लेखाशीर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०२३-२०२४ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा:-

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर -१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ०११-संचालन व प्रशासन, ००१ (१) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई (२२१० ००९३)" |
| २ | मागणी क्रमांक २५-२०७०-इतर प्रशासकीय सेवा, १०६- नागरी संरक्षण, १०६ (१)-वैद्यकीय सेवा (२०७० ०२३६)" |
| ३ | मागणी क्रमांक आर -१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य , ००१-संचालन व प्रशासन, ००१ (२) प्रादेशिक कार्यालय (२२१० ०३५१)" |
| ४ | मागणी क्रमांक आर -१, मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, ००१ (१)- सहसंचालक आरोग्य सेवा, पुणे (२२१० ०३४२)" |
| ५ | मागणी क्रमांक आर -१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, (०१)(०२)- प्रादेशिक कार्यालय (२२१० ०३५१)" |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक ०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. अपर मुख्य सचिव (ले. व को.) यांच्या दिनांक २८ मार्च, २०२३ रोजीच्या पत्रामधील सूचनेनुसार संबधित कार्यालयाने वित्त विभागाच्या दिनांक २९ जून, २०१७ रोजीच्या शासन निर्णयानुसार विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय विभागीय प्रमुख/कार्यालय प्रमुख यांना त्यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांच्या सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव विहीत कालावधीत /त्वरीत वित्त विभागास सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच यानंतर कोणत्याही परिस्थितीत सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता मुदतवाढ दिली जाणार नाही या अटीच्या अधीन राहून परिशिष्ट-अ येथील तक्यात नमूद केलेल्या अस्थायी पदांना दिनांक ३१.०८.२०२३ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१२१४४७५५३८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.04.12 16:02:05 +05'30'

(अ. मा.आत्राम)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
५. .जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
६. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
७. अवर सचिव / कार्यासन अधिकारी, (सेवा-१/सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प), सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
८. निवडनस्ती (आरोग्य-३अ)

"परिशिष्ट-अ"

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक- अपदे-२०२३/प्र.क्र. ९९/आरोग्य-३अ,
दिनांक - १२ एप्रिल , २०२३ सोबतचे विवरणपत्र)

| अ. क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे (पदनाम व पदांची संख्या) |
|---|---|---|---|---|
| १ | आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई | २११ | १७० | १)लेखाधिकारी- १ |
| | | | | २)प्रशासकीय अधिकारी-१ |
| | | | | ३) अधीक्षक-३ |
| | | | | ४)सहायक अधिक्षक/वरिष्ठ सहायक-२ |
| | | | | ५)वरिष्ठ लिपीक/कनिष्ठ सहायक-७ |
| | | | | ६)कनिष्ठ लिपीक/लिपीक टंकलेखक-८ |
| | | | | ७)वाहनचालक-२ |
| | | | | ८)उदवाहनचालक-१ |
| | | | | ९) शिपाई-७ |
| | | | | १०)संशोधन अधिकारी-१ |
| | | | | ११)कनिष्ठ लिपीक-टंकलेखक-१ |
| | | | | १२)नियोजन अधिकारी-१, |
| | | | | १३) प्रशासकीय अधिकारी-१ |
| | | | | १४) सहाय्यक अधिक्षक-१, |
| | | | | १५) वरिष्ठ लिपिक-१, |
| | | | | १६) कनिष्ठ लिपिक-टंकलेखक-१ |
| | | | | १७)सांख्यिकी अन्वेषक-१, |
| | | | | १८) अधिक्षक-१<br>**एकूण पदे - ४१ (०१ पद व्यपगत)** |
| **एकूण** | | **२१२** | **१७०** | **४१ (०१ पद व्यपगत)** |